**सन २०१५-१६ मध्ये कृषि आयुक्तालय, पुणे या कार्यालयास ई-गव्हर्नन्स या योजनेअंतर्गत निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. संगणक- ०६१५/प्र.क्र.१११/१३-अे**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १६/०७/२०१५

<u>वाचा</u> :- १) शासन पत्र,कृ.व पदुम विभाग,क्र.वानियो-२०१४/प्र.क्र.१३८/१४/भाग-४/१४/२-अे, दिनांक १३/०४/२०१५

२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.संप्र/लेखाशिर्ष ३४५१२७८२/अनु.मा.प्र./२०१५-१६/४४/ २०१५, दिनांक १८/०४/२०१५

३) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग,समक्रमांक, दिनांक १६/०६/२०१५

४) शासन निर्णय,कृषि व पदुम विभाग,समक्रमांक, दिनांक १५/०७/२०१५

५) शासन परिपत्रक,वित्त विभाग,क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७/०४/२०१५

**<u>प्रस्तावना</u> :-**

कृषि आयुक्तालय तसेच कृषी व पदुम विभागामध्ये (खुद्द) ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत विविध उपक्रम/योजना राबविण्यात येतात. सदर योजनेअंतर्गत सन २०१५-१६ या वित्तीय वर्षामध्ये रु.१००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. सदर योजनेस संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.त्याअनुषंगाने संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये आयुक्त कृषी तसेच कृषि व पदुम विभाग (खुद्द) या कार्यालयांना लेखानुदानाची अनुक्रमे रु.१०.०० लक्ष व रु.६.६३ लक्ष अशी एकुण रु.१६.६३ लक्ष एवढा निधी वितरीत करण्यात आलेला आहे.

आयुक्त (कृषि) यांच्या कार्यालयाने त्यांच्या संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये सॉफ्टवेअर खरेदी,कनेक्टीव्हीटी,हार्डवेअर खरेदी व प्रचार व प्रसिध्दी या प्रयोजनासाठी रु.२३१.०० लक्ष इतक्या निधीची मागणी केलेली आहे.

वित्त विभागाने संदर्भ क्र.५ च्या परिपत्रकानुसार खर्चाची मर्यादा ७० टक्केपर्यंत केलेली आहे.म्हणजेच या प्रकरणी रु.७०.०० लक्ष इतक्या मर्यादेपर्यंत निधी वितरीत करणे आवश्यक आहे. संदर्भ क्र.४ च्या शासननिर्णयान्वये रु.१६.६३ लक्ष इतकरी लेखानुदानाची रक्कम यापूर्वीच वितरीत करण्यात आलेली आहे.यास्तव उर्वरीत रु.५३.३७ लक्ष (रुपये त्रेपन्न लक्ष सदतीस हजार फक्त ) इतका निधी ई-गव्हर्नन्स या योजनेअंतर्गत कृषि आयुक्तालयास वरील प्रयोजनांसाठी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सन २०१५-१६ मध्ये ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाअंतर्गत आयुक्त (कृषी) या कार्यालयास सॉफ्टवेअर खरेदी,कनेक्टीव्हीटी,हार्डवेअर खरेदी व प्रचार व प्रसिध्दी या बाबींसाठी रु.५३.३७ लक्ष (रुपये त्रेपन्न लक्ष सदतीस हजार फक्त) एवढा निधी खर्च करण्यास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. प्रस्तुतचा खर्च

माहीती व तंत्रज्ञान विभाग व सामान्य प्रशासन विभाग यांनी वेळोवेळी दिलेल्या सुचना व निदेशानूसार करण्यात यावा.

२. प्रस्तुत खर्च सन २०१५-१६ या वित्तीय वर्षामध्ये खालील लेखाशिर्षांतर्गत मंजूर अर्थसंकल्पीत तरतुदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक डी-७
३४५१-सचिवालय-आर्थिक सेवा,
(०२) योजना,
(०२)(०४) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम अंमलबजावणी (कृषि) (३४५१ २७८२)
१७-संगणक खर्च

३. वरील रक्कम कृषि आयुक्तालय, पुणे यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात आली आहे. आयुक्त (कृषि) कार्यालयाकरीता संचालक (आत्मा),महाराष्ट्र राज्य,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय,वित्त विभागाच्या संदर्भ क्र.५ नूसार प्रशासकीय विभागास प्रिदान केलेल्या अधिकारात निर्गमीत करण्यात येत आहे.तसेच सदरहू वित्त विभागाच्या परिपत्रकातील सर्व अटी व शर्तीची पूर्तता करूनच उपरोक्त एकुण रु. रु.५३.३७ लक्ष (रुपये त्रेपन्न लक्ष सदतीस हजार फक्त) खर्च करण्याची संबंधीत दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१५१६४४४००४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SAKHARKAR AMOL NILKANTH

Digitally signed by SAKHARKAR AMOL NILKANTH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AAHDDF,CID - 920025, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAKHARKAR AMOL NILKANTH
Date: 2015.07.17 12:01:43 +05'30'

**( अ.नि.साखरकर )**
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१) मा.आयुक्त (कृषी),कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
२) संचालक (आत्मा),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.

**प्रत,**

१) मा.मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
२) मा.अपर मुख्य सचिव(कृषी),यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक,-कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
३) मा.आयुक्त (कृषि),महाराष्ट्र राज्य,पुणे.
४) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,

५) उपसचिव (फलोत्पादन) यांचे स्वीय सहाय्यक,कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.

६) सर्व विभागीय सह संचालक, द्वारा संचालक (फलोत्पादन) यांचे कार्यालय,कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,

७) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर,

८) महालेखापाल-१/२ , (लेखा परीक्षा) मुंबई /नागपूर,

९) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे.

१०) सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई -३२,

११) निवड नस्ती (१३-अे कार्यासन)